न्यायालयीन प्रकरणात कालमर्यादेत आणि
तत्परतेने कार्यवाही करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- कृबास २०२३ /प्र.क्र.१२९ /११ स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३१.०५.२०२३

वाचा - १) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र संकीर्ण -१०१४/ प्र.क्र ९२/ ११
दिनांक -३१.१२.२०१४
२) विधी व न्याय विभाग ,शासन परिपत्रक क्र जी पी एच -१००० / २२८/ का १४
दिनांक -०७.११.२०००

## शासन परिपत्रक

न्यायालयीन प्रकरणे कालमर्यादित व प्राथम्याने हाताळण्याबाबत शासनाने वेळोवेळी सूचना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच, न्यायालयीन प्रकरणांवर नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने प्रत्येक कार्यालयात नियंत्रण / समन्वय अधिकारी नियुक्त करण्याबाबत शासनाने सूचना दिलेल्या आहेत. तथापि, अलिकडे पणन संचालक ,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांच्या कार्यालयाकडे एका महत्वाच्या न्यायालयीन प्रकरणात मा.न्यायालयाच्या सूचना विहित कालमर्यादेत न पोहचल्याने मा.न्यायालयाने तीव्र नाराजी व्यक्त केली आहे. त्याचप्रमाणे न्यायालयीन प्रकरणी सुनावणीच्या वेळी पणन संचनालाय / संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था यांच्या कार्यालयातील जबाबदार व माहितगार अधिकारी उपस्थित न राहिल्याने अनेक प्रकरणी शासनाची बाजू योग्य प्रकारे मांडली जात नाही.त्यामुळे विहित कालमर्यादेत मा. न्यायालयापुढे शासनाची बाजू सादर करण्यात येत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे.

२. काही प्रकरणी एक दिवस अगोदर किंवा त्याच दिवशी शपथपत्राचा मसुदा शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. अशा प्रकरणी अतिशय कमी कालावधीत प्रकरणाची सर्व माहिती/ कागदपत्रे प्राप्त करून घेऊन त्याचा अभ्यास करून व प्राप्त माहिती विचारात घेऊन शपथपत्रास मान्यता देण्यासाठी फारच कमी कालावधी शासनास मिळतो. त्यामुळे अल्प कालावधीत शासनाची बाजू ही योग्य प्रकारे मांडणे शक्य होत नाही आणि पर्यायाने न्याय निर्णय हे शासनाच्या विरुध्द जाण्याची शक्यता नाकारता येत नाही.म्हणून या सर्व बाबीं पणन संचालक ,महाराष्ट्र राज्य ,पुणे व जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था (सर्व ) यांनी गांभिर्याने घ्याव्यात आणि यापुढे न्यायालयीन प्रकरणात खालीलप्रमाणे कालमर्यादेत आणि तत्परतेने कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

१) राज्यातील सर्व जिल्हा उप निबंधक सहकरी संस्था यांनी त्यांच्या कार्यालयातील सहायक निबंधक सहकारी संस्था यांना संबंधित जिल्ह्यातील न्यायालयीन प्रकरणांच्या नियंत्रणासाठी तसेच पणन संचालनालय तील संबंधित सहायक संचालक यांची Nodal Officer यांची तात्काळ नियुक्ती करून त्याबाबत आदेश निर्गमित करावे.पणन संचालक,महाराष्ट्र राज्य पुणे यांनी जिल्हानिहाय नोडल अधिकारी यांची अद्यावत यादी वेळोवेळी शासनास सादर करावी.

२) नोडल अधिकारी यांनी वाचा येथील दिनांक ७.११.२००० व दिनांक ३१.१२.२०१४ नुसार सूचना व कार्यपद्धती चा अवलंब करून कार्यालय निहाय न्यायालयीन प्रकरणांची नोंदवही तयार करून

वेळोवेळी अद्यावत करावी. तसेच दर महिन्याला न्यायालयीन प्रकरणांचा आढावा घेऊन सर्व जिल्हा उप निबंधक सहकरी संस्था यांनी पणन संचालक,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांना अहवाल सादर करावा.

३)सरकारी वकीलांकडून किंवा परस्पर याचिकाकर्त्यांकडून नवीन न्यायालयीन प्रकरण कार्यालयात प्राप्त झाल्यावर त्याबाबतचे मुळ रिट पिटीशन (याचिका) संबंधित सर्व सह पत्रासह तत्परतेने दोन दिवसांच्या आत संबंधित सहायक निबंधक,सहकारी संस्था यांनी किंवा पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित सहायक संचालक यांनी सरकारी चकिलांच्या कार्यालयात प्रत्यक्ष संपर्क साधून प्राप्त करुन घ्यावे व वरिष्ठ कार्यालयास तत्परतेने सादर करावे.

४) अशा प्राप्त झालेल्या याचिकेतील प्रत्येक मुद्यांबाबत प्रचलित कायद्यांचे व नियमांचे तसेच शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचा सर्वकष अभ्यास करुन परिच्छेदनिहाय अभिप्राय तयार करावेत. सदर परिच्छेदनिहाय अभिप्राय तयार करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था आणि पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित उप संचालक यांची राहिल. तसेच, सदर कार्यवाही ही प्रकरणपरत्वे कालमर्यादेत किंवा पुढील दोन दिवसांत पूर्ण करावी.

५) परिच्छेदनिहाय अभिप्राय तयार झाल्यावर, पणन संचालक,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांनी व्यक्तिशः तपासून शपथपत्राचा मसूदा तयार करण्यासाठी संबंधित सहायक सरकारी वकील यांच्याकडे जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था किंवा प्रकरणपरत्वे पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित उप संचालक अशा माहितगार आणि जबाबदार अधिकाऱ्याने/ कर्मचाऱ्याने अतिरीक्त सरकारी वकील यांना पत्रासोबत परिच्छेदनिहाय अभिप्राय सहपत्रासह प्रत्यक्ष द्यावेत आणि त्याची पोच पावती घ्यावी.

६) शपथपत्राचा मसुदा कालमर्यादित तयार करण्याच्या दृष्टीने संबंधित अतिरीक्त सरकारी वकील यांच्याशी प्रत्यक्ष संपर्क साधून कोणत्याही परिस्थितीत सदर शपथपत्राचा मसुदा हा पुढील दोन दिवसांत तयार करून घ्यावा. याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था आणि पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित उप संचालक यांची राहील.

७) शपथपत्राचा मसुदा तयार झाल्यावर सबंधित सहपत्रासह पणन संचालक ,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांनी स्वतः तपासून शासन मान्यता जेथे आवश्यक आहे तेथे शासन मान्यतेसाठी पुढील दोन दिवसांत खास दूतामार्फत माहितगार अधिकाऱ्यामार्फत सादर करण्याची दक्षता घ्यावी.

८) शपथपत्राच्या मसूद्यास शासनाची मान्यता घेण्यासाठी संबंधित कक्ष अधिकारी / अवर सचिव/उप सचिव/ सह सचिव यांचेकडे सह संचालक/उप संचालक, पणन संचालनालय यांनी आवश्यकते प्रमाणे पाठपुरावा करावा. शासनाची मान्यता मिळाल्यानंतर पणन संचालक ,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांनी सदर शपथपत्र सरकारी वकीलांच्या सहाय्याने दोन दिवसांच्या आत मा. न्यायालयात दाखल करण्याची दक्षता घ्यावी. याबाबत संबंधित अधिकाऱ्यांना निर्देश देण्यात यावेत व ते शपथपत्र दोन दिवसांत दाखल केल्याची संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था तसेच पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित सह संचालक यांनी खात्री करावी.याची संपूर्ण जबाबदारी त्या दोनच अधिकाऱ्यावर राहील.

९) मा. न्यायालयाने ज्या प्रकरणी विहीत कालमर्यादित शपथपत्र दाखल करण्याचे निर्देश दिलेले असतील त्याप्रकरणी पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित उप संचालक किंवा प्रकरणपरत्वे संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था यांनी कोणतीही हयगय न करता न्यायालयाचे आदेश किंवा सरकारी वकीलांचे पत्र प्राप्त झाल्यावर संबंधित सरकारी वकीलांशी त्याच दिवशी किंवा

दुसऱ्या दिवशी प्रत्यक्ष संपर्क साधून शपथपत्राचा मसुदा तयार करुन आवश्यक स्तरांपर्यत मान्यता घेण्याची कार्यवाही करावी.याची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था आणि पणन संचालनालय कार्यालयातील संबंधित सह संचालक यांचीच राहील.

१०) मा. न्यायालयाने सुनावणी ठेवली असेल त्या दिनांकाला जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था कार्यालयातील संबंधित नोडल अधिकारी यांनी व्यक्तीशः उपस्थित राहणे बंधनकारक राहील.

११) मा. न्यायालयात माहितगार व जबाबदार अधिकारी हे आवश्यक त्या कागदपत्रांसह उपस्थित राहतील आणि सरकारी वकीलांशी संपर्क साधून आवश्यक ती माहिती सुनावणीसाठी उपलब्ध करुन देतील. याची दक्षता संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था यांनी घ्यावी.

१२) मा. न्यायालयात किमान जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था या दर्जा असलेला यांनीच शपथपत्र दाखल करावे. त्याखालील दर्जाच्या अधिकाऱ्यांनी न्यायालयाचे आदेश असल्याशिवाय शपथपत्र दाखल करु नये.मा.न्यायालयाचे विशिष्ट आदेश असेल तर संबंधित विनिर्दिष्ट अधिकाऱ्याने कालमर्यादित शपथपत्र दाखल करण्याची कार्यवाही करावी.

१३) न्याय निर्णयाची प्रत मा. न्यायालयाच्या संकेतस्थळावरून किंवा सरकारी वकीलाकडून जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था यांनी तात्काळ प्राप्त करुन घ्यावे. तसेच मा.न्यायलयाने दिलेल्या निर्देशाचे वरिष्ठ कार्यालय व त्याची एक प्रत शासनास तत्काळ अवगत करावे.

१४) शासनाच्या विरोधात निकाल असल्यास पुनर्विलोकन याचिका किंवा वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल करणे आवश्यक आहे किंवा कसे याबाबत सरकारी वकीलांचे लेखी मत तात्काळ प्राप्त करून घ्यावे व त्यानुषंगाने पुढील कार्यवाही संबंधित जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था यांनी विहित कालमर्यादेत करावी.

१५) न्यायालयीन प्रकरणांवर नियंत्रण असण्याच्या दृष्टीने प्रत्येक कार्यालयाने नोडल अधिकारी नियुक्त करण्याचे निर्देश शासनाने दिलेले आहेत. त्यानुसार संबंधित नोडल अधिकाऱ्याने तसेच संबंधित प्रकरण हाताळणारे जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था यांनी प्रत्येक न्यायालयीन प्रकरणी सुनावणीच्या तारखेबाबत अतिशय दक्ष रहावे आणि सुनावणीसाठी उपस्थित राहणेबाबत वरिल निर्देशानुसार तत्परतेने कार्यवाही करावी.

१६) पणन संचालक ,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांनी वरिल सूचनाव्यतिरीक्त आवश्यक वाटतील अशा अन्य सूचना त्यांच्या अधिपत्याखालील सर्व अधिकारी/ कर्मचारी यांना द्याव्यात. तसेच अशा न्यायालयीन प्रकरणाचा किमान दरमहा आढावा घेऊन संबंधित अधिकाऱ्यांना आवश्यक ते निर्देश द्यावेत, जेणेकरून न्यायालयीन प्रकरणावर योग्यप्रकारे नियंत्रण राहील आणि कोणताही अनुचित प्रकार वा विलंब होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

१७) मा.न्यायालयात शपथ पत्र दाखल करण्यासाठी शासन स्तरावरून ज्या अधिकाऱ्यांना प्राधिकृत केलेले आहे, त्याच अधिकाऱ्यांनी शपथ पत्र दाखल करावे , सदर अधिकाऱ्या व्यतिरीक्त कोणत्याही अधिकाऱ्यानी शपथ पत्र दाखल करु नये.

१८) वरिल सूचनांचे काटेकोरपणे पालन व अंमलबजावणी करण्याची जबाबदारी ही संबंधित अधिकाऱ्यांची राहील आणि त्यास विलंब झाल्यास किंवा कालमर्यादित कार्यवाही करण्यात कसूर केल्यास संबंधित अधिकारी/ कर्मचारी शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र राहतील. पणन संचालक ,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांनी उपरोक्त सूचना सर्व अधिकारी/कर्मचाऱ्याच्या निदर्शनास आणाव्यात व त्यांची योग्य प्रकारे अंमलबजावणी होत आहे. याबाबत वेळोवेळी आढावा घेण्याची कार्यवाही करावी.

न्यायालयीन प्रकरणी झालेल्या विलंबाबत / दिरंगाईबाबत / निष्काळजीपणाबाबत तसेच उपरोक्त सूचनांचे कालमर्यादित पालन झाले नाही असे पणन संचालक,महाराष्ट्र राज्य ,पुणे यांच्या निदर्शनास आल्यास संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांचेविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०६०११४००३९९३०२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2023.06.01 14:02:45 +05'30'

**( डॉ. सुग्रिव सं. धपाटे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) पणन संचालक,महाराष्ट्र राज्य ,पुणे
२) सचिव ,राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण ,पुणे
३) जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था (सर्व )
४) कार्यकारी संचालक ,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ ,पुणे
५) उप सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी (कार्यासन १ स /१० स /२१ स /२४ स )
६) निवड नस्ती.